सार्वजनिक वितरण व्यवस्थेतील पात्र लाभार्थ्यांना आगामी गौरी-गणपती उत्सवानिमित्त चार शिधाजिन्नस समाविष्ट असलेला शिधाजिन्नस संच “आनंदाचा शिधा” वितरण करण्याबाबतची कार्यपद्धती.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः आशिवि-२०२४/प्र.क्र.१५/ना.पु.२२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १४ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांक अधापु-२०१५/प्र.क्र.१००/नापु-२२, दिनांक २४ जुलै, २०१५.
२) शासन निर्णय क्रमांक राभादु-१०१७/प्र.क्र.७०/नापु-३१, दिनांक ४ सप्टेंबर, २०१७.
३) शासन निर्णय क्रमांक आशिवि-२०२४/प्र.क्र.१५/नापु-२२, दिनांक १२ जुलै, २०२४.

**परिपत्रक :-**

विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ अंतर्गत राज्यातील लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेमधील अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंब शिधापत्रिकाधारक तसेच छत्रपती संभाजीनगर व अमरावती विभागातील सर्व जिल्हे व नागपूर विभागातील वर्धा या १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्ह्यांतील दारिद्र्य रेषेवरील (एपीएल) केशरी शेतकरी शिधापत्रिकाधारकांना आगामी सन २०२४ मधील गौरी-गणपती उत्सवानिमित्त प्रत्येकी १ किलो परिमाणात साखर, चणाडाळ, रवा व १ लिटर सोयाबीन तेल या परिमाणात ४ शिधाजिन्नस समाविष्ट असलेला शिधाजिन्नस संच “आनंदाचा शिधा” वितरीत करण्याबाबस निर्णय घेण्यात आला आहे.

त्यानुषंगाने पात्र शिधापत्रिकाधारकांना शिधाजिन्नस संचांचे वितरण करण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१. राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अंत्योदय अन्न योजना, प्राधान्य कुटुंब तसेच औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व जिल्हे व नागपूर विभागातील वर्धा अशा १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील एपीएल (केशरी) शेतकरी शिधापत्रिकाधारकांना प्रत्येकी १ किलो परिमाणात साखर, चणाडाळ, रवा व १ लिटर सोयाबीन तेल (९००-९१० ग्रॅम) या ४ शिधाजिन्नसांचा समावेश असलेला १ शिधाजिन्नस संच प्रति शिधापत्रिका ई-पॉस प्रणालीद्वारे प्रति संच ₹ १००/- या दराने वितरीत करावेत.

२.	जिल्हानिहाय पुरवठा करावयाच्या शिधाजिन्नस संचांच्या संख्येचे विवरणपत्र सोबत जोडलेले आहे. सदर संख्येच्या मर्यादेत स्मार्ट सर्व्हिसेस प्रा. लि. यांनी शिधाजिन्नस संच संबंधित तालुका गोदामांपर्यंत विहित मुदतीत पोहोचवावेत.

३.	गोदामात येणारी शिधाजिन्नस आवक तसेच रास्त भाव दुकानात पाठवण्यात येणारे शिधाजिन्नस यांची नोंद online पद्धतीनेच ठेवणे आवश्यक आहे. त्यानुसार AePDS पोर्टलवर योग्य त्या नोंदी घेण्याची दक्षता घ्यावी.

४.	जिल्ह्याकरीता आवश्यक असणारे पुरवठादाराकडून प्राप्त होणारे शिधाजिन्नस तालुका गोदामांमध्ये व्यवस्थितरीत्या उतरवून घेण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी/ उप नियंत्रक यांची राहील. शिधाजिन्नस उतरविण्याकरीता येणाऱ्या हमाली खर्चाचे प्रदान विभागाकडून करण्यात येईल. त्यानुषंगाने सदर देयके वित्तीय सल्लागार व उपसचिव यांना सादर करण्यात यावीत.

५.	शिधाजिन्नस संचात समाविष्ट शिधाजिन्नस खराब न होण्याची/ खाण्यास अयोग्य होण्याची मुदत (expiry date) साखर, चना डाळ, खाद्यतेल याकरीता कमीतकमी ४ महिन्यांची असल्याची व रवा याकरीता कमीतकमी ३ महिन्यांची असल्याची खात्री करूनच पुरवठादाराकडून शिधाजिन्नस संच स्विकारण्यात यावेत.

६.	शिधाजिन्नस संचात समाविष्ट शिधाजिन्नस FSSAI मानकाची पूर्तता करीत असल्याचे NABL अधिकृत प्रयोगशाळेचे प्रमाणपत्र पुरवठादाराच्या प्रतिनिधीने संबंधित गोदामपाल यांच्याकडे सुपूर्द करावा. कोणत्याही परिस्थितीत निकृष्ट दर्जाचे शिधाजिन्नस / शिधाजिन्नस संच स्वीकारले जाणार नाहीत, याची दक्षता घ्यावी.

७.	पुरवठादाराकडून तालुका गोदामात शिधाजिन्नस संच प्राप्त झाल्यावर, जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी/ उप नियंत्रक यांनी स्वत: अथवा तहसिलदार यांच्यापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याची नेमणूक करून शिधाजिन्नस संचाची पुरवठादाराच्या प्रतिनिधीसमोर यादृच्छिकपणे (randomly) नमुने गोळा करावेत. सदर नमुन्यांची NABL अधिकृत प्रयोगशाळेत तपासणी करावी. सदर तपासणीअंती नमुना विहित निकषांची पुर्तता करीत नसल्याचे आढळल्यास, पुरवठादारास तात्काळ अवगत करून संबंधित शिधाजिन्नस संचाचा साठा (Lot) बदलून घेण्याबाबत कार्यवाहीकरावी.

८.	सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी/ उप नियंत्रक यांनी सुट्टीच्या दिवशी गोदाम चालू ठेवण्याबाबतच्या संबंधीतांना सुचना देण्यात याव्यात.

९.	सदर शिधाजिन्नस संच प्रति संच ₹ १००/- या दराने वितरीत करावयाचे आहेत. सदर विक्रीपोटी प्राप्त होणारी रक्कम रास्तभाव दुकानदारांनी मार्जिन वजा करुन उर्वरित रक्कम जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उप नियंत्रक यांच्याकडे शिधाजिन्नस संचांच्या वितरणानंतर ७ दिवसांत जमा करावी. सदर शिधाजिन्नस संचांची विक्री करण्याकरिता संदर्भाधीन दिनांक ४ सप्टेंबर,

२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार रास्तभाव दुकानदारांना मार्जिन देय राहील. तसेच शिधाजिन्नस संच वितरणाचा कालावधी विचारात घेता, एका महिन्याच्या कालावधीत संपूर्ण शिधाजिन्नस संचांचे वितरण करण्याबाबत रास्तभाव दुकानदारांना आपल्या स्तरावरून सूचित करण्यात यावे.

१०. जिल्ह्यातील सर्व पात्र लाभार्थ्यांना आगामी गौरी-गणपती उत्सवानिमित्त वितरीत करावयाच्या शिधाजिन्नस संच "आनंदाचा शिधा" योजनेचा लाभ सुनिश्चित करण्याकरीता, या योजनेबाबतची जनजागृती करण्याची कार्यवाही संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उप नियंत्रक यांनी करावी.

११. जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी/ उप नियंत्रक यांनी त्यांच्या जिल्ह्याकरिता प्राप्त व वितरीत होणाऱ्या शिधाजिन्नस संचांची माहिती शासनास वेळोवेळी उपलब्ध करुन द्यावी व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

१२. प्रस्तुत शिधाजिन्नस संचांच्या खरेदीसाठी स्मार्ट सर्व्हीसेस प्रा. लि. यांच्याशी करारनामा करण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार व उपसचिव यांनी करावी.

१३. स्मार्ट सर्व्हीसेस प्रा. लि. यांनी शासनास पुढील मुद्द्याबाबतची माहिती दररोज napu२२.mhpds@mah.gov.in या ई-मेल वर तसेच वित्तीय सल्लागार व उपसचिव यांना सादर करावी:-

अ) शासनाने विहीत केलेल्या ठिकाणी (ठिकाणांच्या नावांसह) पोहोच केलेले शिधाजिन्नस संच.

ब) पुरवठादाराकडे / स्मार्ट सर्व्हीसेस प्रा. लि. यांच्याकडे शिल्लक राहिलेले शिधाजिन्नस संच.

१४. उपरोक्त कार्यपद्धतीनुसार सर्व संबंधितांनी कार्यवाही करावी. सदर कार्यवाहीमध्ये कोणत्याही प्रकारे कसूर झाल्यास संबंधितांना जबाबदार धरण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०८१४१९०७००८६०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH UMESHRAO GAIKWAD

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BC8833F9E213A7E4DFB9D2B071C9202EA52A04054E53B0C1BBF9E50C90A2CF5C, cn=SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2024.08.14 19:24:52 +05'30'

**( संतोष गायकवाड )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
८) सर्व मंत्रालयीन विभाग
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१२) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१३) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१५) सर्व उपायुक्त (पुरवठा)
१६) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१७) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१८) सर्व कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१९) सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२०) सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२३) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई
२६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, मुंबई
२७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
२८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ द्वारा - वित्तीय
२९) सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
३०) वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
३१) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
३२) स्मार्ट सर्व्हीसेस प्रा. लि., ४०३, वेस्टर्न कोर्ट, बिल्डींग डी, ई-स्क्वेअर, भांबुर्डा, शिवाजी नगर पुणे-४११०१६.
३३) निवडनस्ती (कार्यासन नापु-२२).

| Sr. No. | District | District wise Allocation |
|---|---|---|
| 1 | A Region | 129425 |
| 2 | Ahemadnagar | 654544 |
| 3 | Akola | 311648 |
| 4 | Amravati | 533399 |
| 5 | Beed | 451303 |
| 6 | Bhandara | 243616 |
| 7 | Buldhana | 469669 |
| 8 | Chandrapur | 417720 |
| 9 | Chhatrapati Sambhajinagar | 538965 |
| 10 | D Region | 177718 |
| 11 | Dharashiv | 289252 |
| 12 | Dhule | 304021 |
| 13 | E Region | 426210 |
| 14 | F Region | 654040 |
| 15 | G Region | 236510 |
| 16 | Gadchiroli | 211369 |
| 17 | Gondia | 246936 |
| 18 | Hingoli | 208402 |
| 19 | Jalgaon | 594057 |
| 20 | Jalna | 347052 |
| 21 | Kolhapur | 527991 |
| 22 | Latur | 403025 |
| 23 | Nagpur DSO | 428934 |
| 24 | Nagpur FDO | 400597 |
| 25 | Nanded | 535201 |
| 26 | Nandurbar | 270099 |
| 27 | Nashik | 811925 |
| 28 | Palghar | 360628 |

| | | |
|---|---|---|
| **29** | **Parbhani** | **283054** |
| **30** | **Pune DSO** | **540000** |
| **31** | **Pune FDO** | **330987** |
| **32** | **Raigad** | **396991** |
| **33** | **Ratnagiri** | **258359** |
| **34** | **Sangali** | **396290** |
| **35** | **Satara** | **396315** |
| **36** | **Sindhudurg** | **148120** |
| **37** | **Solapur DSO** | **351086** |
| **38** | **Solapur Fdo** | **114303** |
| **39** | **Thane** | **153285** |
| **40** | **Wardha** | **271256** |
| **41** | **Washim** | **246815** |
| **42** | **Yavatmal** | **532213** |
| | **TOTAL** | **15603328** |